श्री. जनार्दन निकम व इतर २५ रोजंदारी
पाणी पुरवठा कामगारांना मा.न्यायालयाच्या
आदेशानुसार न्या.कालेलकर करारानुसार
पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी
आस्थापनेवर घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्युपीटी-२६०९/प्र.क्र.४९६/आस्था-१०,**
**बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ**
**फोर्ट,मुंबई-४०० ०३२,**
तारीख: **२८ एप्रिल २०१७**

वाचा

१) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१.
२) विभागीय आयुक्त,औरंगाबाद विभाग यांचे पत्र क्र.२०१७/विशा/आस्था/झेडपीई/सीआर/ कावि-०२,दि.०८/०१/२०१७

प्रस्तावना:- रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना न्या. कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने धोरणात्मक निर्णय घेतला असून, जे कर्मचारी सार्वजनिक बांधकाम विभाग, दि.२४.४.२००१ च्या शासन निर्णयामधील अटींची पूर्तता करतील त्यांना न्या.कालेलकर करारानुसार फायदे देण्यासाठी रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि. २४.४.२००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील अट क्र.१ नुसार रोजंदारी / कार्यव्ययी आस्थापनेवरील जे कर्मचारी शासन सेवेत /जिल्हा परिषद सेवेत कार्यरत आहेत आणि त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून त्यांच्या सलग सेवेस उशीरात उशीरा दि.३१.१२.१९९८ रोजी ५ वर्षे व प्रत्येक वर्षी कामाचे २४० दिवस पुर्ण झालेली आहेत आणि करारातील अटींची पूर्तता करतील अशा कर्मचाऱ्यांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. तसेच अट क्र. २ नुसार रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यामुळे शासकीय सेवेतून कमी करण्यात आले होते. तथापि, ज्या कर्मचाऱ्यांनी अशा कपातीविरुध्द न्यायालयात दावे दाखल केलेले आहेत, अशा कर्मचाऱ्यांपैकी ज्यांना न्यायालयाच्या निर्णयानुसार पुन:स्थापित करण्यात आलेले आहे. अशा कर्मचाऱ्यांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. याचबरोबर परिच्छेद क्र.२ नुसार ज्या कर्मचाऱ्यांनी न्यायालयात दावे/रिव्हीजन/अपिल/अवमान याचिका दाखल केलेली आहे, अशा सर्व

कर्मचाऱ्यांनी सर्व प्रकारचे दावे विनाअट मागे घेतल्यानंतर त्यांना रूपांतरीत नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

२. न्या. कालेलकर करार मागणी-१ रोजंदारी आस्थापना परिच्छेद-२८ मध्ये नियमित आस्थापनेवर नेमणूक मिळण्याबाबत खालील तरतूद आहे.

"रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर कामगार नेमला गेला की, त्याला मुंबई मुलकी सेवा नियम लागू होतात."

३. अखिल मराठवाडा जिल्हा परिषद कामगार युनियन, औरंगाबाद यांनी जिल्हा परिषद, औरंगाबाद अंतर्गत कार्यरत रोजंदारी पाणी पुरवठा कामगारांना सीआरटीवर घेणेबाबत रिट पिटीशन क्रमांक ५३२४/२००९ महाराष्ट्र शासन व इतर यांच्या विरुद्ध याचिका दाखल केलेली होती. सदर याचिकेवर दिनांक ३/२/२०१६ रोजी पाणी पुरवठा विभागातील सदर रोजंदारी आस्थापनेवर कार्यरत कर्मचा-यांना नियमित आस्थापनेवर घेणेबाबत निर्णय दिलेला आहे.

४. पाणी पुरवठा विभागाकडून सन १९७८ मध्ये त्रिस्तरीय करारांतर्गत पाणी पुरवठा योजनेवरील कर्मचा-यांच्या सेवा जिल्हा परिषदांकडे हस्तांतरित करण्यात आलेली आहे. पाणी पुरवठा योजनेवरील कर्मचाऱ्यांच्या सेवा जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित करण्यात आलेल्या असून सदर कर्मचाऱ्यांचे वेतन/निवृत्ती वेतनावरील खर्च जिल्हा परिषदेने त्यांच्या स्वनिधीतून करायचा आहे. त्यासाठी शासनाकडून अनुदान मिळणार नाही, या अटींच्या अधीन राहून पाणी पुरवठा योजना जिल्हा परिषदांकडे हस्तांतरित करण्यास शासनाने धोरणात्मक मंजूरी दिली आहे. त्यामुळे या योजनेवरील कर्मचाऱ्यांना जिल्हा परिषदेच्या स्वनिधीतून वेतन अदा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा परिषदेची असून शासन त्यासाठी अनुदान देत नाही.

५. जिल्हा परिषद, औरंगाबाद अंतर्गत कार्यरत ३७ रोजंदारी पाणी पुरवठा कर्मचा-यांपैकी ३१ कर्मचा-यांची सेवा नियमित करुन त्यांना कालेलकर आयोग आणि भोळे कमिशन देण्याचे आदेश मा.औद्योगिक न्यायालयाने दिले होते. शासन निर्णय दिनांक १० जुलै, १९७४ नुसार या कर्मचा-यांना त्यांची सेवा ५ वर्षे पुर्ण झाल्यानंतर त्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर न घेतल्याने अखिल मराठवाडा जिल्हा परिषद कामगार युनियन, औरंगाबाद यांनी मा.उच्च न्यायालयात याचिका क्र.५३२४/२००९ दाखल केली. सदर याचिकेवर दिनांक ३/२/२०१६ रोजी पाणी पुरवठा विभागातील सदर रोजंदारी आस्थापनेवर कार्यरत कर्मचा-यांना नियमित आस्थापनेवर घेणेबाबत निर्णय दिलेला आहे. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयाविरुद्ध जिल्हा परिषदेने मा.सर्वोच्च न्यायालयात एसएलपी-३७९५/२०१७ दाखल केली. मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ६/३/२०१७ च्या आदेशान्वये मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद यांचा दिनांक ३/२/२०१६ चा निकाल कायम करुन एसएलपी खारीज केली आहे. त्यामुळे सदर पाणी पुरवठा कर्मचा-यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेणे बंधनकारक आहे. त्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेतले नसल्याने अखिल मराठवाडा जिल्हा परिषद कामगार युनियन यांनी अवमान याचिका क्रमांक सीपी-११/२०१७ मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केली आहे.

६. मा.उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.५३२४/२००९ मध्ये दिनांक ३/२/२०१६ रोजी पारीत केलेल्या आदेशात असे नमूद केले आहे की, जिल्हा परिषद, औरंगाबाद अंतर्गत कार्यरत रोजंदारी पाणी पुरवठा कामगार हे सन १९८९/१९९१ पासून अखंडीत सेवेत आहेत. तसेच मा.औद्योगिक न्यायालयाने असेही निरीक्षण नोंदविले आहे की, सदर कर्मचा-यांना न्या. कालेलकर करारानुसार रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर न घेणे ही बाब अनुचित कामगार प्रथा आहे, याची दखल मा.उच्च न्यायालयाने घेतली आहे व सदर पाणीपुरवठा कामगारांना शासन निर्णय दिनांक १०/७/१९७४ ची अंमलबजावणी करुन रुपांतरीत नियमित अस्थायी आस्थापनेवर घेणेबाबत आदेशित केले आहे. त्याअनुषंगाने सदर कर्मचा-यांना न्या. कालेलकर करारानुसार रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेणेबाबतचे आदेश काढणे आवश्यक आहे.

## शासन निर्णय

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४.४.२००१ मधील तरतूदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग यांचे प्रस्तावातील श्री.जनार्दन निकम व इतर २५ रोजंदारी पाणी पुरवठा कामगारांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र.६ मधील पदावर व रकाना क्र.७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे:-

२. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या.कालेलकर कराराच्या तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन पुढील प्रमाणे करण्यात येईल:-

- जिल्हा परिषद, औरंगाबाद मधील श्री.जनार्दन निकम व इतर २५ रोजंदारी पाणी पुरवठा कामगार यांना पुर्नस्थापित केल्याच्या दिनांकापासून त्यांचे रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापर्यंतच्या वेतनवाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) ही त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.
- श्री.जनार्दन निकम व इतर २५ रोजंदारी पाणी पुरवठा कामगार यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून दि.३०/०६/२०१६ पर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकरच्या भत्त्यासहित) सन-२०१६-२०१७ या आर्थिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यांत संबंधित कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीत दहा (१०) समान हप्त्यात जमा करण्यात यावी व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा झाल्यापासून ३ वर्षापर्यंत सदर रक्कम त्यांना खात्यातून काढता येणार नाही.

· उपरोक्त कर्मचारी जर सेवानिवृत्त झाले असतील, अशा कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) त्यांना अनुज्ञेय होणारी थकबाकीची संपूर्ण रक्कम ही त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

३. वर नमूद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचाऱ्यांकडून अथवा दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसाकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यांत येणार नाही, अशाप्रकाराचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील.

४. पाणी पुरवठा योजनेवरील कर्मचाऱ्यांना जिल्हा परिषदेच्या स्वनिधीतून वेतन अदा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा परिषदेची असून त्यासाठी शासनाकडून अनुदान मिळणार नाही.

५. रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, सदर आदेश श्री.जनार्दन निकम व इतर २५ रोजंदारी पाणी पुरवठा कामगारांना मान्य नसल्यास त्यांनी त्याबद्दलचे लेखी प्रतिवेदन त्याला व्यक्तीनिहाय आदेश मिळाल्यापासून तीन महिन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्यांचे काढलेले आदेश अंतिम समजण्यात येतील व त्यानंतर त्यांची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

६. अस्थायी आस्थापनेवर रुपांतरित झालेले पद संबंधित पदधारक ज्या दिनांकापर्यंत सेवेत असतील त्या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यात येत आहे.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२८१६०५०४२३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित क्ज्ण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Krishna M Koyande

Digitally signed by Krishna M Koyande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8c2c1d009807227d35b72f2d929161451512ee1bf3441873da0069eeb66c68a6, cn=Krishna M Koyande
Date: 2017.05.02 16:36:48 +05'30'

कृष्णा मु. कोयंडे
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) महालेखापाल,महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२,नागपूर,

२) प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

३) सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

४) विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त कार्यालय,औरंगाबाद विभाग,

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद

६) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

७) मा.राज्यमंत्री, (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,औरंगाबाद

९) वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

१०) निवड नस्ती, कार्यासन आस्था.१०,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

परिशिष्ट-“अ”

शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.डब्ल्युपीटी-२६०९/प्र.क्र.४९६/ आस्था-१०,
दिनांक- २८ एप्रिल २०१७ चे सहपत्र.

| अ. क्र. | कर्मचारीचे नाव | आस्थापनेचा प्रकार | नेमणूकीचे पद | विभागाचे नाव | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाच्या पदाचे नाव | ज्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचा आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.जनार्दन भानुदास निकम | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९२ |
| २. | श्री.शेख चाँद शेख अहेमद | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १४/७/१९९२ |
| ३ | श्री.कल्याण महादू मुळे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१२/१९९२ |
| ४ | श्री.रुद्रप्पा सदाशिव ज्ञाने | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१२/१९९४ |
| ५ | श्री.भिमराव श्रीपत शिंदे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१२/१९९४ |
| ६ | श्री.हरीदास बाजीराव कावले | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१२/१९९४ |
| ७ | श्री.विठ्ठल कोंडीबा शिंदे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१२/१९९४ |
| ८ | श्री.गणेश शामराव दौड | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१२/१९९४ |
| ९ | भिमराव रामजी भिवसने | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१/१९९५ |
| १० | श्री.पुंडलिक रतन गुंजाळ | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/६/१९९५ |
| ११ | श्री.दगडू आबाराव कापसे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/७/१९९५ |
| १२ | श्री.महेबूब खा महेताब खा पठाण | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१२/१९९५ |
| १३ | श्री.लक्ष्मण पुंडलिक चव्हाण | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१/१९९६ |
| १४ | श्री बन्सीलाल रामसिंग परदेशी | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१/१९९६ |
| १५ | श्री.पांडुरंग भागवत वरपे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९६ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १६ | श्री.वाळूबा मोहनाजी तायडे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९६ |
| १७ | श्री.रामराव पांडू भोटकर | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९६ |
| १८ | श्री.फुलाजी बंडू भोटकर | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९१ |
| १९ | श्री.उत्तम देऊबा शिंदे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९१ |
| २० | श्री.बालाजी श्रीराम काथार | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९१ |
| २१ | श्री.गंगाधर भाऊराव ठोंबरे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९६ |
| २२ | श्री.आसाराम बाबूराव शिंदे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९६ |
| २३ | श्री.सुपडू बिरामन बमणावत | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/६/१९९६ |
| २४ | श्री.मथ्थू अनंदा सयवर | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/७/१९९६ |
| २५ | श्री.पोपट लक्ष्मण घडामोडे | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/५/१९९६ |
| २६ | श्री.जीवनसिंग धेंडूसिंग राठोड | रोजंदारी | कामगार | जि.प.औरंगाबाद | वालमन | १/१/१९९७ |

Krishna M Koyande

Digitally signed by Krishna M Koyande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8c2c1d009807227d35b72f2d929161451512ee1bf3441873da0069eeb66c68a6, cn=Krishna M Koyande
Date: 2017.05.02 16:37:37 +05'30'

(कृष्णा मु. कोयंडे)

कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.